मंत्रालय सुरक्षा प्रकल्पांतर्गत M/s.Secutech Automation India Pvt. Ltd या कार्यान्वयन कंपनीस मंत्रालय सुरक्षा प्रकल्पांतर्गत कामासाठीच्या फॅसिलीटी मॅनेजमेंट सर्व्हिस, वार्षिक देखभाल-दुरुस्ती कराराबाबतचे (OPEX Quarterly payment) ०४ तिमाहीचे तिमाहीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीईएस ०११७/ प्र.क्र.३२ (भाग-२)/विशा-४**
दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुख्य इमारत, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १० जून, २०२४.

**वाचा :-**

१. गृह विभाग, शासन निर्णय क्र. पीईएस ०५१७/ प्र.क्र.१३७/विशा-४, दिनांक ३० जून, २०१७.
२. गृह विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. पीईएस ०५१७/ प्र.क्र.१३७/विशा-४, दिनांक २७ जुलै, २०१७.
३. गृह विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. पीईएस ०५१७/ प्र.क्र.१३७/विशा-४, दिनांक २१ सप्टेंबर, २०१७
४. पोलीस आयुक्त, मुंबई यांचे कार्यालयाचे दिनांक १५ जानेवारी, २०१८ चे पत्र.
५. गृह विभाग, शासन निर्णय क्र. पीईएस ०११७/ प्र.क्र.३२/विशा-४, दिनांक १३ जून, २०१८
६. गृह विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. पीईएस ०११७/ प्र.क्र.३२/विशा-४, दिनांक ०८ ऑगस्ट, २०१८.
७. मे.सेक्यूटेक ऑटोमेशन इंडिया प्रा.लि. मुंबई यांचे दिनांक २३.०१.२०२३ रोजीची ३ देयके.
८. शासन पत्र क्र. पीईएस०११७/प्र.क्र.३२ (भाग-१)/विशा-४, दिनांक ०६.०९.२०२३.
९. मे.सेक्यूटेक ऑटोमेशन इंडिया प्रा.लि. मुंबई यांचे दिनांक ०५.०२.२०२४ रोजीचे देयक.

**प्रस्तावना :-**

मंत्रालय सुरक्षा प्रकल्प फेज-१ अंतर्गत कामासाठी येणा-या रु.१३.०६ कोटी इतक्या खर्चास गृह विभाग, शासन निर्णय दिनांक ३०.०६.२०१७ व शासन शुध्दीपत्रक दिनांक २७.०७.२०१७ व दिनांक २१.०९.२०१७ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तथापि सदर प्रकल्पासाठी सादर करण्यात आलेल्या सुधारित खर्चाच्या तक्त्यानुसार सदर प्रकल्पासाठी १.CCTV Surveillance,

२.Instrusion prevention and detection system, ३. Vehicle Management System व ४. Drone Surveillance या कामांच्या भाडवली बाबींसाठी (CAPEX) रु.६,४९,७२,०३७/- इतका खर्च व प्रकल्प कार्यान्वयन व देखभालीसाठी (OPEX for ५ Years) रु.१,६३,३४,२४६/- इतका खर्च अशा एकंदर रु.८,१३,०६,२८३/- इतका खर्च अधिक वस्तू आणि सेवा कर (GST १८%) रु.१,४६,३५,१३१/- अशा एकूण ९,५९,४१,४१४/- इतक्या खर्चास, तसेच मंत्रालयासभोवतालच्या कंपाउंड भिंतीच्या बांधकामासाठी बांधकाम विभागाच्या कामासाठी व विद्युत विभागाच्या कामासाठी रु.३.०० कोटी अशा एकूण १२,५९,४१,४१४/- इतक्या खर्चासाठी शासन निर्णय दिनांक १३.०६.२०१८ व शासन शुध्दीपत्रक दिनांक ०८.०८.२०१८ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली.

२. त्याअनुषंगाने, पोलीस आयुक्त, मुंबई कार्यालयामार्फत निविदा प्रक्रिया राबवून मंत्रालय सुरक्षा प्रकल्प अंतर्गत कामकाजाचे रु.८,१३,०६,२८२.६६/- इतक्या रकमेचे अंतिम आदेश M/S.Secutech Automation India Pvt. Ltd. या कंपनीस त्यांच्या कार्यालयाच्या दिनांक १५.०१.२०१८ च्या कार्यालयीन आदेशान्वये देण्यात आलेले आहेत. त्यानुसार M/S.Secutech Automation India Pvt. Ltd. कंपनीने दिनांक ०१.०३.२०१८ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रकल्पाचे Request for Proposal (RPF) नुसार शासन निर्णय दिनांक १३.०६.२०१८ व शासन शुध्दीपत्रक दिनांक ०८.०८.२०१८ अन्वये मंत्रालय अंतर्गत सुरक्षेकरिता फेज-१ प्रकल्पासाठी Request for Proposal (RPF) मधील ई-निविदा नियम क्र.१३-Master Service Agreement मधील पृष्ठ क्र.९२ वर अ.क्र.४-Fees मधील अटीनुसार सदर कंपनीस प्रथम १० टक्के बँक गॅरंटी सादर केलेनंतर रु.५६,९१,४४०/- इतकी रक्कम (GST न आकारता) , तद्नंतर ६० टक्के रु.४,१३,१९,८५३/- एवढी रक्कम १८ आठवडेनंतर भाग-१ मधील काम पूर्ण झालेवर, २० टक्के रु.१,३४,३१,७९८/- एवढी रक्कम २५ आठवडेनंतर भाग-२ मधील अ.क्र.४ मधील काम पूर्ण झालेवर व प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर उर्वरित १० टक्के CAPEX आणि १०० टक्के OPEX ची रु.३,५४,९८,३२/- इतकी रक्कम ५ वर्षात समान २० हप्त्यात १०० टक्के काम पूर्ण झालेनंतर M/S.Secutech Automation India Pvt. Ltd.अदा करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

३. संदर्भ क्र.९ येथील दिनांक ०५.०२.२०२४ रोजीच्या देयकान्वये मे. सेक्यूटेक ऑटोमेशन इंडिया प्रा.लि. कंपनी, मुंबई यांनी फॅसिलीटी मॅनेजमेंट सर्व्हिस, वार्षिक देखभाल-दुरुस्ती कराराबाबतचे (OPEX Quarterly payment) ०४ तिमाहीचे (जानेवारी-२०२३ ते डिसेंबर-२०२३) या कालावधीचे एकूण रक्कम रु.७०,७३,१९०/- (रु.सत्तर लक्ष, त्र्याहत्तर हजार एकशे नव्व्द फक्त) एवढया रकमेचे देयक सादर केले आहे. त्याअनुषंगाने मंत्रालय सुरक्षा प्रकल्पांतर्गत M/s.Secutech Automation India Pvt. Ltd या कार्यान्वयन कंपनीस फॅसिलीटी मॅनेजमेंट सर्व्हिस, वार्षिक देखभाल-दुरुस्ती कराराबाबतचे (OPEX Quarterly payment) एकूण रक्कम रु.७०,७३,१९०/- (रु.सत्तर लक्ष, त्र्याहत्तर हजार एकशे नव्व्द फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

मंत्रालय सुरक्षा प्रकल्पांतर्गत M/s.Secutech Automation India Pvt. Ltd या कार्यान्वयन कंपनीस कंपनीस फॅसिलीटी मॅनेजमेंट सर्व्हिस, वार्षिक देखभाल-दुरुस्ती कराराबाबतचे (OPEX Quarterly payment) ०४ तिमाहीचे (जानेवारी-२०२३ ते डिसेंबर-२०२३) या कालावधीचे एकूण रु.७०,७३,१९०/- (रु.सत्तर लक्ष, त्र्याहत्तर हजार एकशे नव्वद फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचे अनुदान मागणी क्र.बी-१०, २०५५ पोलीस, ११५ पोलीस दलाचे आधुनिकीकरण, (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प, (२०५५A०३२-५२) यंत्रसामग्री व साधसामग्री या लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावे.

३. सदरचा खर्च करण्यासाठी पोलीस आयुक्त, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी तसेच त्यांच्या अधिनस्त वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ मधील वित्तिय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उप विभाग-तीन, अ.क्र.४, परिच्छेद क्र.२७ (२) अन्वये प्रशासकीय विभागला असलेल्या पूर्ण अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१०१५०९०३२६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2024.06.10 15:22:33 +05'30'

**( चेतन निकम )**
**उप सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
३) पोलीस उपायुक्त, मंत्रालय सुरक्षा, मंत्रालय, मुंबई
४) मे.सेक्युटेक ऑटोमेशन इंडिया प्रा.लि., ४०१, आर्ट गिल्ट हाऊस, फिनिक्स मॉल, एल.बी.एस. मार्ग, कमानी, कुर्ला (पश्चिम), मुंबई-४०० ०७०.
५) महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
६) महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
७) अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९) वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती- विशा-४, गृह विभाग.